**भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील**
**उप अभियंता (यां) पदावरील तदर्थ**
**नियुक्ती पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः याचिका २०१४/प्र.क्र.१७७/पापु-१५**
गो. ते. रूग्णालय आवार, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१.
तारीख: १६ डिसेंबर, २०१४

<u>वाचा :-</u>

**१) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. आपना-२०१३/प्र.क्र.२४९/पापु १५, दि. ३१/७/२०१४.**

**२) मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद यांचे ओ.अे.क्रमांक ३९६/२०१४ वरील दिनांक ०८/१०/२०१४ चे आदेश.**

**३) महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद यांचे ओ.अे.क्रमांक ३९६, ४३६, ४३७, ४३८/२०१४ वरील दिनांक १०/१२/२०१४ चे आदेश.**

**<u>प्रस्तावना :-</u>**

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील उप अभियंता (यां) ही पदे सेवाप्रवेश नियमातील तरतूदीनुसार ५०:५० याप्रमाणे नामनिर्देशनाने व पदोन्नतीने भरण्यांत येतात. सदर पदे रिक्त असल्याने व शासकीय कामकाज पार पाडण्यासाठी रिक्त असलेली पदे भरण्याच्या हेतूने शाखा अभियंत्यांना तदर्थ स्वरुपात उप अभियंता (यां) पदावर सन २००८ पासून पदोन्नत्या देण्यात आल्या आहेत. सदर तदर्थ स्वरुपातील पदोन्नत्या महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार उपलब्ध होईपर्यंत किंवा ११ महिन्यांच्या कालावधी पर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत देण्यात आल्या होत्या.

२. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून नामनिर्देशनाच्या कोट्यातील पदांवर १६ उमेदवारांच्या शिफारशी प्राप्त झाल्यानंतर त्यातील १५ उमेदवारांच्या नियुक्त्या, तदर्थ स्वरुपात कार्यरत असलेल्या उप अभियंत्यांना शाखा अभियंता या पदावर पदावनत करुन शासन निर्णय, दिनांक ३१/७/२०१४ अन्वये करण्यांत आल्या आहेत. श्री.एम.आर.लाड, यांनी त्यांच्या पदावनतीच्या आदेशाविरोधात मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद येथे मूळ अर्ज क्र.३९६/२०१४, दाखल केला होता.श्री.एम.आर.लाड यांनी दाखल केलेल्या मूळ अर्जांवर मा.न्यायाधिकरणासमोर सुनावणी होऊन त्यावर मा.न्यायाधिकरणाने वेळोवेळी स्थगिती दिली आहे. मा.न्यायाधिकरणाने श्री.एम.आर.लाड यांच्या पदावनतीस दिलेली स्थगिती पुढे चालू ठेऊन श्री.लाड यांना त्यांच्या पदावरुन कार्यमुक्त करण्यास प्रत्यावाय नसावा असे आदेश दिनांक ०८/१०/२०१४ रोजी दिले आहेत. मा.न्यायाधिकरणाचे दिनांक ०८/१०/२०१४ रोजीचे आदेश विचारात घेऊन श्री.नितीन मुरलीधर दंडगव्हाळ यांना उप अभियंता (यां), ग्रामीण पाणी पुरवठा उपविभाग, जिल्हा परिषद अहमदनगर या पदावर रुजू करुन घेण्यात यावे असे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर यांना शासन पत्र दिनांक ११ नोव्हेंबर, २०१४ अन्वये कळविण्यांत आले आहे. तसेच श्री.लाड यांना उप अभियंता पदावर पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

मा. प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद यांनी ओ. अे. क्र. ३९६, ४३६, ४३७, ४३८/२०१४ वर दिनांक १०/१२/२०१४ रोजी दिलेल्या आदेशानुसार श्री. एम.आर.लाड यांच्या दिनांक ३१/०७/२०१४ च्या पदावनतीच्या आदेशास याद्वारे स्थगिती देण्यांत येत आहे. श्री. एम.आर.लाड यांची उप अभियंता (यां) या पदावरील तदर्थ पदोन्नती, महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार उपलब्ध होईपर्यंत किंवा सदर पद नियमितरित्या भरण्यात येईपर्यंत किंवा ११ महिन्याच्या कालावधीपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत पुढे चालू ठेवण्यांत येत आहे. श्री.लाड यांना खालीलप्रमाणे पदस्थापना देण्यांत येत आहे.

| अ.क्र. | उमेदवाराचे नाव | पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|
| १ | श्री. एम.आर. लाड | जिल्हा परिषद, अहमदनगर, देखभाल व दुरूस्ती कक्षातील उपअभियंता (यां) या पदावर |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२१५१५४४०२२७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kanade Pramod G

Digitally signed by Kanade Pramod G
DN: CN = Kanade Pramod G, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2014.12.16 12:10:57 +05'30'

**( प्र. गि. कानडे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे

२. उप संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नाशिक

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर

४. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर

५. श्री. एम.आर.लाड उप अभियंता (यां) (संचालनालयामार्फत)

६. निवड नस्ती (पापु-१५)